विशेष मागास प्रवर्गाकरिता शासकीय/
निमशासकीय सेवेत आरक्षण.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 15 डिसेंबर, 1995.

पहा :- (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 8 डिसेंबर, 1994.

(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 2 जानेवारी, 1995.

(3) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 7 डिसेंबर, 1994.

(4) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 13 जून, 1995.

(5) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 15 जून, 1995.

(6) समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, शुध्दीपत्र क्र. सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 15 जून, 1995.

(7) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 3 जुलै, 1995.

## शासन निर्णय

समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाने शासन निर्णय, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 13 जून, 1995 व समक्रमांकाचे शुध्दीपत्र, दिनांक 15 जून, 1995 नुसार जाहीर केलेल्या विशेष मागास प्रवर्गासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 15 जून, 1995 अन्वये शासकीय/निमशासकीय सेवेत 2% आरक्षण निर्धारित करण्यात आलेले आहे. ह्या शासन निर्णयाच्या परिच्छेद-4 अन्वये सुधारणा करून दिनांक 3 जुलै, 1995 रोजी सुधारित आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. फेरविचाराअंती शासनाने दिनांक 3 जुलै, 1995 रोजीचा शासन निर्णय रद्द केला आहे व दिनांक 15 जून, 1995 चा आदेश कायम ठेवावा असा निर्णय घेतला आहे. दिनांक 15 जून, 1995 ते दिनांक 3 जुलै, 1995 मधील कालावधीत जर कोणास पदावनत केले असेल तर त्यांस पूर्ववत लाभ देण्यात यावा व त्याचे नुकसान होणार नाही हे पहावे असे आदेशही देण्यात येत आहेत.

2. शासन असाही आदेश देत आहे की, विशेष मागास प्रवर्गातील जातीसंदर्भात समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाने यापुढे काही बदल केल्यास ते या आदेशासही लागू राहतील.

3. हे आदेश मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुखांच्या व कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(क. चं. श्रीवास्तव)

प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव, राज्य निवड मंडळ,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

---

* पत्राने.

मुच-1354(अ)(4000-1-96)-अ.